**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१००+ग्रेड पे रु. ५४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्याची सूधारीत पदस्थाना..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मवैअ-२०१५/प्र.क्र.११९०/सेवा-३**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकूल इमारत, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ०५ ऑगस्ट, २०१७

**वाचा :-** शासन आदेश, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमाक-मवैअ-२०१६/प्र.क्र.९३६/सेवा-३ दि.३१.१२.२०१६

**शासन आदेश :-**

डॉ. भोजराज श्यामराव मडके, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, पोलीस रुग्णालय, पोलीस मुख्यालय नागपूर यांची उक्त संदर्भाधीन आदेशान्वये डागा स्त्री रुग्णालय, नागपूर येथे करण्यात आली होती. सदर बदली आदेशाच्या अनुषंगाने डॉ. मडके यांनी मा. उच्च न्यायालयात रिट याचिका क्र.४४१४/२०१७ दाखल केली होती. सदर याचिकेच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने दि.१३/०७/२०१७ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन उपरोक्त संदर्भाधीन दि.३१.१२.२०१६ च्या आदेशान्वये डॉ. मडके, वैद्यकीय अधिकारी डागा स्त्री रुग्णालय, नागपूर यांची करण्यात आलेली बदली याद्वारे रद्द करण्यात येत असून, त्यांची सुधारीत पदस्थापना पर्यवेक्षीय नागरी कुष्ठरोग पथक क्र.३, नागपूर येथे करण्यात येत आहे.

२. सदर आदेश महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) आणि ४ (५) च्या तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. संबंधितांनी डॉ. मडके, वैद्यकीय अधिकारी यांना बदलीच्या ठिकाणी त्वरित रुजू करुन घ्यावे व सदर वैद्यकीय अधिकारी यांनी रुजू अहवाल संबंधितांस तसेच शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201707261242027117 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Hanmantrao Bhosale

Digitally signed by Satish Hanmantrao Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4c0ff0607bc973d9663171bd9b8a9b9ab8cb569b155f9653d1180a4549819299, cn=Satish Hanmantrao Bhosale
Date: 2017.08.05 17:31:08 +05'30'

**( स. ह. भोसले )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२) उप संचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ नागपूर
३) जिल्हा शल्यचिकित्सक, नागपूर
४) महालेखापाल, १/२ (लेखा व परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
५) जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर
६) वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, गडचांदूर जि. नागपूर
७) डॉ. भोजराज श्यामराव मडके, वैद्यकीय अधिकारी,
( उपसंचालक, आरोग्य सेवा,नागपूर मंडळ नागपूर यांचे मार्फत)
८) सरकारी अभियोक्ता, मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर.
९) निवडनस्ती सेवा-३